एकत्रित आयुष्मान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेमधील उपचारांच्या यादीत सुधारणा करण्याकरीता -अभ्यास समिती॰ गठीत करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२५/प्र.क्र.८६/ई-१०४४९४/आरोग्य-६

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
१० मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: १७ एप्रिल, २०२५

वाचा :

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै, २०२३**

प्रस्तावना :

उपरोक्त वाचा येथील सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.२८ जुलै,२०२३ च्या शासन निर्णयान्वये राज्यात एकत्रित आयुष्मान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी दि.१ जुलै,२०२४ पासून राज्य शासनाकडून राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत सुरु आहे. सदर योजनेत सध्या एकूण १३५६ उपचार उपलब्ध आहेत. सदर उपचार निश्चित करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नियामक परिषदेच्या बैठकीत दिलेल्या सूचनेनुसार आणि प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण विभाग यांच्या मान्यतेने मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी यांच्या दि.२२ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या पत्रान्वये आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. या समितीने पूर्वीच्या उपचारपध्दतीतील विशेषज्ञ सेवानिहाय उपचारांचा व दरांचा आढावा घेऊन केलेल्या शिफारशीनुसार, एकूण १३५६ उपचार, त्यापैकी ११९ शासकीय रुग्णालयांसाठी राखीव उपचार, २६२ पाठपुरावा उपचार आणि योजनेतील रस्ते अपघातसंबधातील एकूण १८४ उपचार यांचा समावेश उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट २ ते ५ मध्ये करण्यात आला आहे. सदर विस्तारीत योजनेत आरोग्य संरक्षणाची मर्यादा रु.५ लाख प्रति कुटुंब प्रति वर्ष इतकी वाढविण्यात आली आहे. त्यानुसार, वाढीव दराच्या उपचारांचा समावेश योजनेत करण्यात यावा, सध्याच्या उपचारांच्या दरात सुधारणा करण्यात यावी, उपचार पॅकेजेसमध्ये सुसूत्रता असावी, आणखी काही उपचारांचा समावेश करावा आणि शासकीय राखीव उपचारांचा फेरविचार करावा अशा मागण्या सातत्याने प्राप्त होत आहेत. याशिवाय, केंद्र शासनाच्या HBP २०२२ मधील उपचार राज्याच्या योजनेत लागू करुन त्यामध्ये राज्याच्या उपचारांपैकी आवश्यक उपचारांची भर घालून एकत्रित उपचारांची यादी तयार करावी असाही निर्णय शासन स्तरावर झाला आहे. याबाबत दि. १८.०३.२०२४ रोजी विधानपरिषद सभागृहात लक्षवेधी सूचनेवरील चर्चेदरम्यान निवेदन करताना मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व

कुटुंब कल्याण यांनी विविध विषयातील तज्ञ डॉक्टरांचा समावेश असलेली समिती गठीत करण्याचे आश्वासित केले आहे. त्यानुसार आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

एकत्रित आयुष्मान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत उपचारांची व दरांची निश्चिती, केंद्र शासनाच्या व इतर राज्यांच्या उपचारांचा तुलनात्मक अभ्यास करण्यासाठी व अनुषंगीक बाबीसंदर्भात अभ्यास करुन शिफारशी करण्यासाठी आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. समितीची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| अ.क्र. | नाम / पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी | सदस्य |
| ३ | संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ४ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ५ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये, बृन्हमुंबई महानगरपालिका | सदस्य |
| ६ | वैद्यकीय संचालक/ वैद्यकीय अधीक्षक, टाटा मेमोरिअल हॉस्पिटल, मुंबई | सदस्य |
| ७ | सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई | सदस्य |
| ८ | अध्यक्ष, इंडियन मेडिकल असोसिएशन, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ९ | अध्यक्ष यांनी आमंत्रित केलेले, योजनेतील अंगीकृत खाजगी वैद्यकीय महाविद्यालयांचे २ प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |
| १० | अध्यक्ष यांनी आवश्यकतेनुसार आमंत्रित केलेले शासनाचे विभाग, संचालनालये, रुग्णालये इ. आणि खाजगी क्षेत्रातील विशेषज्ञ | निमंत्रित सदस्य |
| ११ | उपमुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी | सदस्य |
| १२ | मुख्य वैद्यकीय सल्लागार-१/२, राज्य आरोग्य हमी सोसायटी | सदस्य |
| १३ | मुख्य आरोग्य अधिकारी, अंमलबजावणी सहाय्य संस्था (सर्व) | सदस्य |
| १४ | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई | सदस्य सचिव |

३. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील: -

१) आयुष्मान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेमधील (HBP२२) उपचार, महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेतील उपचार, केंद्र शासनाच्या इतर आरोग्य योजनांमधील उपचार व इतर काही

राज्यांच्या योजनेतील उपचारांचा तुलनात्मक अभ्यास करुन राज्याच्या योजनेसाठी उपचारांची समग्र यादी तयार करणे.

२) प्राथमिक आरोग्य सेवेतील आवश्यक उपचार तसेच आवश्यक वैद्यकीय चाचण्या यांचा समावेश करण्यासाठी शिफारस करणे.

३) वरील सर्व प्रकारच्या उपचारांच्या व चाचण्यांच्या दरांचा पॅकेजनिहाय आढावा घेऊन दर निश्चितीबाबत शिफारस करणे.

४) दुर्मिळ आजारांसाठी आवश्यक असणाऱ्या रु.५ लक्ष पेक्षा अधिक खर्चाच्या उपचारांची शिफारस करणे.

५) शासकीय रुग्णालयांसाठी राखीव असलेल्या उपचारांचा आढावा घेऊन आवश्यक सुधारणाबाबत शिफारस करणे.

६) वैद्यकीय उपचारांच्या मार्गदर्शक तत्त्वांची (Clinical Declaration Form) निश्चिती करणे.

७) योजनेंतर्गत उपचार घेणाऱ्या एकूण रुग्ण संख्येपैकी बहुसंख्य रुग्णांवर शासकीय व निमशासकीय अंगीकृत रुग्णालयांमधून उपचार केले जावेत यासाठी उपाययोजना सुचविणे.

८) केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री वय वंदना योजनेच्या धर्तीवर राज्यामध्ये ६०/६५ वर्षे वयावरील नागरिकांसाठी योजनेचा विस्तार करण्यासंदर्भात शिफारस करणे.

४. समितीच्या कामकाजाच्या अटी व शर्ती:

१) समितीने प्रथम बैठकीच्या दिनांकापासून एका महिन्याच्या मुदतीत अंतिम अहवाल शासनास सादर करावा.

२) समितीच्या शिफारशींची व्याप्ती महात्मा फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या योजनांतील उपचार व प्रक्रिया तसेच योजनेअंतर्गत अंगीकृत रूग्णालये यांच्यापुरती मर्यादित राहील.

३) आवश्यकतेनुसार अशासकीय सदस्य निमंत्रित करण्याचा अधिकार समितीस राहील.

४) महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या पॅनलवरील ४ (चार) खाजगी रुग्णालयाच्या व्यवस्थापकांचे अभिप्राय घेवून समितीने एक महिन्याच्या आत अहवाल सादर करावा.

५. बैठक आयोजनाचा खर्च आणि अशासकीय सदस्यांचा शासकीय दरानुसार प्रवास खर्च व दैनिक भत्ता राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या प्रशासकीय/कार्यालयीन खर्चासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१७११५९५६७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2025.04.17 12:55:05 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) सचिव-१, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव-२, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
९) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान मुंबई -०१
१०) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई -०१
११) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई
१३) अध्यक्ष, इंडियन मेडिकल असोसिएशन, महाराष्ट्र राज्य (आयुक्त आरोग्य सेवा मुंबई यांच्यामार्फत)
१४) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
१५) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१६) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१७) सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) वैद्यकीय अधिक्षक/ अधिष्ठाता, टाटा मेमोरियल हॉस्पीटल, मुंबई (आयुक्त आरोग्य सेवा मुंबई यांच्यामार्फत)
१९) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
२०) निवड नस्ती.